**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता समग्र शिक्षा अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता पुनर्विनियोजनाने निधी उपलब्ध करण्याबाबत.केंद्र हिस्सा लेखाशिर्ष (२२०२ आय६४८) व राज्य हिस्सा लेखाशिर्ष (२२०२ आय६५७)**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९/ प्र.क्र. ०४ / कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
**तारीख: ०६ फेब्रुवारी,२०२०.**

<u>वाचा -</u>

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३,दि.०१.०४.२०१९
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दि.०८.०७.२०१९
३) शासन ज्ञापन, आदिवासी विकास विभाग क्र.पुनर्वि-२०१९/प्र.क्र.८६ दि.०५.०२.२०२०
४) शालेय शिक्षण विभाग, नस्ती क्र. निधीवि-२०१९/प्र.क्र.१०६/प्रशिक्षण.

**शासन निर्णय-**

सन २०१९ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात समग्र शिक्षा अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र. टी-५, २२०२ , सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, ७९६ जनजाति क्षेत्र उपयोजना (०१) जनजाति क्षेत्र उपयोजना (०१) (१०) समग्र शिक्षा अभियान ( ६० टक्के केंद्र हिस्सा ) लेखाशिर्ष (२२०२ आय ६४८ ), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) करिता रु.१५६८७.२१ लाख इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली असुन त्यास समरुप राज्य हिस्सा म्हणून (०१) (११) समग्र शिक्षा अभियान (४० टक्के राज्य हिस्सा ) लेखाशिर्ष (२२०२ आय ६५७) ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) करिता एकुण रु.५०००.१० लाख इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत संदर्भ क्र.४ येथील प्रस्तावान्वये विनंती केल्यानुसार केंद्र हिश्श्याकरीता (लेखाशीर्ष २२०२ आय ६४८ ) ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) रु. १६५.२३ लाख इतका निधी उपलब्ध तरतुदीतून व राज्य हिश्श्याकरीता ( लेखाशीर्ष २२०२ आय ६५७) ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) रु.११०.१५ लाख (अक्षरी रुपये एक कोटी दहा लाख पंधरा हजार फक्त) इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे एकूण रू.२७५.३८ लाख (अक्षरी रुपये दोन कोटी पंच्याहत्तर लाख अडतीस हजार फक्त) इतका निधी शिक्षक शिक्षण या घटकाकरीता प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. विभागप्रमुख /नियंत्रक अधिकारी यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार सदर निधी याच वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी

विकास; तसेच आदिवासी विकास विभाग व शालेय शिक्षण विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रण अधिकारी/ विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात विविध योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ व २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारांत निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२००२०६१२१२०४२३२४** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.02.06 18:21:34 +05'30'

**(किरण कि.पवार)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ अमरावती.
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
८. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.